आदर्श ग्रामसेवक/ ग्राम विकास अधिकारी यांना राज्यस्तरीय पुरस्कार देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन परिपत्रक क्रमांक :- ग्रामसे- २०१६/प्र.क्र. २४६/आस्था-७,**
**२५- मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट,**
**मुंबई-४०० ००१,**
**दिनांक : १७ मार्च, २०१७.**

वाचा:- १) शासन निर्णय क्रमांक- वैप्रोब-१०९६/प्र.क्र. ३२०२/४९,
दिनांक १० नोव्हेंबर, १९९८.
२) शासन निर्णय क्रमांक-ग्रासेपु-२०११/प्र.क्र.१०८/आस्था-९,
दिनांक-१९ एप्रिल, २०१२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य ग्रामसेवक संघटनेने जिल्हयातील ग्रामपंचायतीमध्ये सर्वोत्कृष्ट कार्य करणाऱ्या ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांना आदर्श ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी म्हणून सन्मानीत करण्याची शासनाकडे मागणी केले होती. आपली बहुसंख्य जनता ही ग्रामीण भागात राहणारी असल्याने ग्रामीण भागाचा विकास हा आपल्या देशाचा विकासाचा पाया आहे. ग्रामीण अर्थव्यवस्थेचा हा पाया मजबूत करण्यासाठी ग्रामीण भागातील लोकांच्या गरजा, सोयी यांचा विचार करुन स्थानिक पातळीवर निर्णय घेण्याच्या उद्देशाने ग्रामपंचायतीची स्थापना करण्यात आली आहे. शासनाच्या विविध कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी ग्रामपंचायती मार्फत करण्यात येते. त्यांच्या यशस्वी अंमलबजावणीत ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी हा प्रमुख घटक असतो. त्यांच्या कार्याचा गौरव व्हावा व त्याला आपले कार्य आवडीने/जोमाने करण्यासाठी प्रोत्साहन मिळावे म्हणून सर्वोत्कृष्ट कार्य करणाऱ्या ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांना आदर्श ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी म्हणून सन्मानित करण्याचा निर्णय शासनाने दिनांक १० नोव्हेंबर, १९९८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

प्रत्येक गटातून ( तालुक्यातून ) एक सर्वोत्कृष्ट ग्रामसेवक/ग्राम विकास अधिकारी निवडून जिल्हा परिषदांमार्फत त्याचा सत्कार करण्यात येतो. सर्वोत्कृष्ट ग्रामसेवक म्हणून निवड झालेल्या ग्रामसेवकाला मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे स्वाक्षरीने प्रशस्ती पत्रक व सन्मान पदक देण्यात येते. आदर्श ग्रामसेवक/ ग्रामविकास अधिकारी यांची संदर्भ क्रमांक-२ येथे नमूद दिनांक १९.०४.२०१२ च्या शासन निर्णयांन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समिती मार्फत निवड करण्यात येते. त्यासाठी दिनांक १० नोव्हेंबर, १९९८ चा शासन निर्णयासोबत देण्यात आलेल्या परिशिष्टामधील बाबींचा/निकषांचा विचार

करुन प्रत्येक ग्रामसेवक/ ग्रामविकास अधिकारी यांनी केलेल्या कामाचे मुल्यमापन करुन तालुक्यात सर्वोत्कृष्ठ ठरणाऱ्या ग्रामसेवकाची निवड करण्यात येते.

प्रत्येक जिल्हयातून सर्वोत्कृष्ट ठरणाऱ्या ग्रामसेवक/ ग्रामविकास अधिकारी यांची निवड करुन त्यांना राज्यस्तरीय आदर्श ग्रामसेवक/ ग्रामविकास अधिकारी म्हणून सन्मानित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत विचारांती शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :-

ग्रामीण भागातील जनतेचे राहणीमान उंचाविण्यास व अडचणी सोडविण्यास सर्वोतोपरी सहाय्यभूत ठरणाऱ्या एका ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकाऱ्याची आदर्श ग्रामसेवक / ग्रामविकास अधिकारी म्हणून जिल्हयातून निवड करण्यात यावी. सदर निवड संदर्भ क्रमांक-२ येथे नमूद दिनांक १९ एप्रिल, २०१२ च्या शासन निर्णयांन्वये गठीत करण्यात आलेल्या, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीमार्फत करण्यात यावी.

२. प्रत्येक जिल्हयातुन एक या प्रमाणे सर्वोत्कृष्ठ ठरणाऱ्या ग्रामसेवक/ ग्रामविकास अधिकारी यांना राज्यस्तरीय आदर्श ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी पुरस्कार मा. मंत्री (ग्राम विकास) यांच्या हस्ते यशवंत पंचायत अभियान पुरस्कार वितरण सोहळयाच्या वेळी वितरीत करण्यात येईल. सर्वोत्कृष्ट ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी म्हणून निवड झालेल्या ग्रामसेवक/ ग्रामविकास अधिकारी यांना मा. मंत्री (ग्राम विकास) यांच्या स्वाक्षरीने प्रशस्तीपत्रक देण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१७१२४४१९९६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Govind Mahadeo Mainkar

Digitally signed by Govind Mahadeo Mainkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=R. D. D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bd72d2fe0ead7cc96c89d7989efeeb507d84e5de5113b7aa9e6c0ce344b1475, cn=Govind Mahadeo Mainkar
Date: 2017.03.30 10:57:26 +05'30'

**(गोविंद माईणकर)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मंत्रालयीन सर्व विभागांचे अतिरीक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
२) सर्व विभागीय आयुक्त

३) सर्व जिल्हाधिकारी.
४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
५) सर्व जिल्हा परिषदांचे अतिरीक्त मुख्य कार्यकारी अधिकारी
६) अप्पर संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष, ग्राम विकास विभाग, मुंबई.
७) सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.
८) मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
९) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
१०) ग्राम विकास विभागातील सर्व अधिकारी.
११) अध्यक्ष, ग्रामसेवक संघटना.
१२) निवडनस्ती.